**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत "उपसंचालक, गट-अ" या पदावर नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्ती देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांक : औसुवआ ०९२३/प्र.क्र.१४९/काम.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ जूलै, २०२४

संदर्भ : १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.आयएलआर-२१२१/प्र.क्र.१४/२०२१/अठ्ठावीस, दि.०६.०९.२०२३.
२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१.
३) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि.२१.०६.२०२१
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८, दि.२२.०६.२०२१
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१६७/१६-अ, दि.२१.११.२०२२
६)उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाचा क्र.औसुवआ ०९२३/प्र.क्र.१६०/काम.१, दि.१२.१०.२०२३ रोजीचा शासन निर्णय.
७) संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये गठीत समितीचा दि.७.२.२०२४ रोजीचा अहवाल.
८) शासन पत्र क्र. औसुवआ-०९२३/प्र.क्र.१४९/काम.१,दि.२८/२/२०२३.
९) श्रीम.सुप्रिया कोरके यांचे दि.१२/३/२०२४ रोजीचे निवेदन.
१०) प्र.स. (कामगार) यांचेकडे दि.१२/३/२०२४ रोजी पार पडलेल्या सुनावणीचे इतिवृत्त.

## <u>शासन आदेश</u>

उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या अधिनस्त औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत "उपसंचालक, गट-अ" या पदांवरील नियुक्तीसाठी (जाहिरात क्र. ०१८/२२) सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांच्या क्रमांक:-आयएलआर-२१२१/प्र.क्र.१४/२०२१/अठ्ठावीस, दि.०६.०९.२०२३ च्या पत्रान्वये उपसंचालक, गट-अ या पदावर नियुक्तीसाठी ९ उमेदवारांची शिफारस केली आहे.

सदर उमेदवारांना संदर्भाधीन क्र.२ येथील महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१

लागू आहेत. याबाबत उमेदवारांकडून प्राप्त विकल्पानुसार सदर अधिसूचनेन्वये अनुज्ञेय ठरणाऱ्या विभागीय महसुली विभागातंर्गत उपसंचालक, गट-अ या पदावर तात्पुरती पदस्थापना देणे आवश्यक आहे.

शासनाच्या प्रचलित नियमानुसार सदर उमेदवारांची संबंधित वैद्यकीय मंडळाकडून तपासणी करण्यात आलेली आहे. तसेच, सामान्य प्रशासन विभागाने चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची पडताळणी करण्याबाबत जारी केलेल्या शासन निर्णय दिनांक २८.०८.२०१७ नुसार उपरोक्त उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी संबंधित पोलीस आयुक्त / पोलीस अधीक्षक कार्यालयांकडून करुन घेण्यात आलेली आहे.

तथापि, सदर प्रकरणी शिफारसपात्र उमेदवारांच्या अनुभव प्रमाणपत्रांच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे दाखल मूळ अर्ज क्र.९९५/२०२३, ९९६/२०२३ व १०२४/२०२३ अन्वये आक्षेप घेण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन शासनाने संदर्भ क्र. ६ अन्वये प्रस्तुत प्रकरणी कागदपत्रे पडताळणीकरिता कामगार आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने संदर्भ क्र. ७ नुसार शासनास अहवाल सादर केला आहे. त्यामध्ये उप संचालक,गट-अ या संवर्गातील काही उमेदवारांना समितीने अपात्र ठरविलेले होते. याबाबतचा प्रस्ताव नियुक्ती प्राधिकारी तथा मा.मंत्री (कामगार) यांच्या मान्यतेसाठी सादर केला असता, त्यांना सदरहू समितीने अपात्र केलेल्या उमेदवारांप्रकरणी “फेर चौकशी” करणेबाबत दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने सबंधित उमेदवारांच्या अनुभव प्रमाणपत्रांमध्ये संदीग्धता दिसून येत असल्याकारणाने, सदरहू उमेदवारांची शिफारस रद्द न करता, त्यांची फेरचौकशी करण्याच्या अनुषंगाने मा.प्रधान सचिव (कामगार) यांचेकडे सुनावणी आयोजित करून, सबंधित उमेदवारांना समितीचा निर्णय कळवून,त्यांना त्यांचे लेखी म्हणणे मांडण्याची संधी उपरोक्त संदर्भीय क्र.८ येथील दि.२८/२/२०२४ च्या पत्राव्दारे देण्यात आली.

त्याअनुषंगाने उपरोक्त संदर्भीय क्र.९ व १० येथील दि.१२/३/२०२४ रोजीच्या निवेदनाच्या व पार पडलेल्या सुनावणीच्या इतिवृत्तानुसार नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाव्दारे पुरस्कृत उमेदवारांपैकी पात्र ठरणाऱ्या खालील उमेदवारांची रकाना क्र. ६ मधील अनुज्ञेय ठरणाऱ्या महसुली विभागांतर्गत रकाना क्र. ७ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी **उपसंचालक, गट-अ या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० (रुपये ५६,१००-१,७७,५००)** मध्ये ते ज्या दिवशी रुजू होतील, त्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी तक्त्याखालील अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ क्र | गुणवत्ताक्र. | उमेदवाराचे नाव | मूळ जात प्रवर्ग | मलोआने शिफारस केलेला प्रवर्ग | विभागीय महसूली संवर्ग वाटप | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| १ | ५ | श्रीम.सुप्रिया सुरेश कोरके | खुला (महिला) | खुला (महिला-१) | कोकण-२ | ठाणे |

२. सदरहू शासन आदेश सदर प्रकरणी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ नागपूर येथे दाखल मूळ अर्ज क्र.९९५/२०२३, ९९६/२०२३ व १०२४/२०२३ मध्ये मा. न्यायाधिकरणाच्या न्यायनिर्णयाच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही २०१८/व्ही.आय.पी.६७/ प्र.क्र.२०७/कार्या.१२, दिनांक २८.०५.२०१८ मधील तरतुदीनुसार उमेदवाराने सदर पदावर नियुक्ती आदेशापासून तीस दिवसांच्या आत सेवेत रुजू होणे आवश्यक आहे. सदर कालावधीत उमेदवार रुजू झाला नाही तर तो नोकरीची संधी गमावेल व त्याचा नियुक्तीकरिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणा-या कोणत्याही कारणांचा/ विनंतीचा विचार केला जाणार नाही.

४. सदर उमेदवार आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत पदस्थापनेच्या जागी हजर न झाल्यास किंवा काही अपरिहार्य उचित कारणास्तव त्यांना मुदतवाढ हवी असल्यास, त्यांनी शासनाकडून मुदतवाढ घेणे आवश्यक असून तशी संमती न घेतल्यास किंवा शासनाकडून त्यांना मुदतवाढ न मिळाल्यास विहित मुदतीत रुजू न होणाऱ्या उमेदवारांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील व त्यांचा नियुक्तीकरीता कोणत्याही परिस्थितीत विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही. मुदतवाढीसंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०१८/ व्ही.आय.पी. ६७/प्र.क्र.२०७/कार्या.१२, दिनांक २८.०५.२०१८ व दिनांक २६.०९.२०१८ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

५. मागासवर्गीय उमेदवारांचे बाबतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीचे आणि लागू असेल तेथे उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याच्या प्रमाणपत्राची पडताळणी करण्याच्या अधीन राहून नियुक्ती देण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांचे प्रकरणी सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीसीसी २०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मध्ये विहित मुदतीत जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवारांची राहील व विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकल्यास, त्यांच्याबाबतीत तातडीने सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात येईल.

६. संदर्भ क्र.३ येथील शासन अधिसूचनेअन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन ) नियमावली,२०२१ मधील तरतुदीनुसार सदरहू उमेदवारांची उप संचालक,गट-अ या संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्यात येईल

७. उपरोक्त उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/ कार्या.८, दिनांक २२.०६.२०२१ नुसार नवीन परिवीक्षा धोरण लागू राहील. सदरहू उपसंचालक, गट-अ यांना दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी लागू राहील. सदर कालावधीत परिवीक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास सक्षम नसल्याचे सिद्ध झाल्यास संबंधित उमेदवाराची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल." तसेच सदर अधिसूचनेमध्ये

नमूद केल्यानुसार परिवीक्षाधीन कालावधीत रजेच्या तरतूदी लागू होतील. तसेच, सदरहू शासन निर्णयतील तरतूदीनुसार, उपरोक्त उमेदवारांना परिविक्षा कालावधीमध्ये कोणतीही वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाही.

८. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक राआयो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दिनांक ३१.०५.२०२१ अन्वये खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांसाठी (EWS) शासकीय सेवेमध्ये १०% जागा आरक्षित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार आर्थिकदृष्टया दुर्बल घटकामध्ये मोडत असल्याचे (EWS) प्रमाणपत्रांची फेर पडताळणी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून करून घेण्याच्या अटीच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

९. उमेदवारांना नियमाप्रमाणे मराठी/हिंदी भाषा परिक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण व्हावी लागेल.

१०. सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), शासन निर्णय प्रशिक्षण २०००/प्र.क्र.१६१/ २००१/३९, दिनांक १९.०३.२००३ कडील तरतुदीनुसार, संगणक हाताळणी/वापरांबाबतचे शासन मान्यता प्राप्त संस्थेचे प्रमाणपत्र, नियुक्ती दिनांकापासून दोन वर्षाच्या कालावधीत सादर करणे आवश्यक आहे. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन पुरकपत्र क्रमांक : मातंसं २०१२/ प्र.क्र.२७७/ ३९, दिनांक ०८.०१.२०१८ मधील परिच्छेद क्रमांक १.६ मधील तरतूदीनुसार संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट अनुज्ञेय राहील.

११. उपरोक्त उमेदवारांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो १००५/ १२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

१२. उपरोक्त उमेदवारांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/ ९२/ ८, दिनांक ०२.१२.१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ लेखी सूचना किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. यासंदर्भातील राजीनामा स्विकारण्याचे अधिकार केवळ नियुक्ती प्राधिकारी (शासन) यांना असतील. क्षेत्रिय कार्यालयांनी उमेदवारांचा परस्पर राजीनामा स्विकृत करु नये किंवा मंजूर करु नये. मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी सूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

१३. उपरोक्त उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुसऱ्या पदावर परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची “उपसंचालक, गट-अ” या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : वेतन १२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

तर, उपरोक्त उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत नसणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची “उपसंचालक, गट-अ” या पदावरील वेतननिश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

१४. उपरोक्त उमेदवार सध्या केंद्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील, तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

१५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक वशिअ १२१४/प्र.क्र.२६/११, दिनांक ०२.०६.२०१४ नुसार उमेदवाराने नियुक्तीच्या दिनांकापासून दोन महिन्यांच्या कालावधीत त्यांची स्वत:ची मत्ता व दायित्वे याबद्दलची विवरणपत्रे शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र एक, दोन व तीन या तीन प्रपत्रांमध्ये नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे सादर करावीत.

१६. उपरोक्त उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१६७/१६-अ, दि.२१.११.२०२२ मधील तरतूदीनुसार EWS आरक्षण प्रकरणी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मा.उच्च न्यायालय येथे प्रलंबित याचिका तसेच मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका (डायरी) क्र.२९१७४/२०२२ मधील अंतिम निकालाच्या अधिन राहिल.

१७. उपसंचालक, गट-अ या पदांवर हजर होणाऱ्या उमेदवारांनी आपला रुजू अहवाल संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचेमार्फत शासनास सादर करावा.

१८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१११७५८१०८८१० असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHILPA GIRISH CHAUDHARI

Digitally signed by SHILPA GIRISH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=c302cfaa4da0b2d72c4622c85421df78e53b25c22ce3da5d53104e3a7a72c8ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F91D4AFBD1E1BF5BE92C2964CCBA9768C05DC4A771EA96939883ABF6C9F5A37E, cn=SHILPA GIRISH CHAUDHARI
Date: 2024.07.11 18:09:43 +05'30'

**( शिल्पा चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**श्रीम.सुप्रिया सुरेश कोरके, उप संचालक,गट-अ**
(या शिफारसपात्र उमेदवारांस ई-मेल संदेशाद्वारे व संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांचेमार्फत)

प्रत :-

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव

२. मा. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक

३. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई

४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)

५. महालेखापाल-१/२,लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

६. संचालक,लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य, मुंबई/पुणे/नाशिक/ नागपूर/ भांडारा/सोलापूर.

७. उपसचिव/ अवर सचिव (काम-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग

८. निवड नस्ती (काम-१)